# गलिव्हरच्या अद्‌भुत सफरी



निवेदक:- मा. कृ. बेहेरे एम.ए.

भाग २

सुंदर साहित्य प्रकाशन, पुणें २

# गलिव्हरच्या अद्‌भुत सफरी

## भाग ३ रा

(छोटया वाचकांचें भरपूर मनोरंजन
करणारें अद्‌भुतरम्य कथानक)

निवेदक
मा. कृ. बेहेरे
एम. ए.

सुंदर-साहित्य प्रकाशन, पुणें९.

किंमत ७५ पैसे

प्रकाशिका :
सौ. स्नेहलता वा. मेहेंदळे
सुंदर-साहित्य प्रकाशन,
९१/२ पर्वती, पुणें ९.



प्रथमावृत्ति : नोव्हेंबर १९६८

किंमत ७५ पैसे

मुद्रक :
वा. म. मेहेंदळे,
जयभारत मुद्रणालय,
५५१ बुधवार, पुणें २.

## निरोप घेण्यापूर्वी—

प्रिय वाचक,

माझ्या पूर्वीच्या दोन सफरींत मला जगावेगळे असे, दोन टोंकांचे, दोन विलक्षण अनुभव आले होते.

लिलिपुटसारख्या वीतभर किंवा कमी उंचीच्या लोकांच्या देशांत मला प्रथम राक्षस म्हणून वागविण्यांत आलें व नंतर लिलिपुटचें शत्रुराष्ट्र जें 'ब्लेफुस्को' त्याचा पराभव करण्याकरतां माझा उपयोग केला गेला.

लिलिपुट व ब्लेफुस्को या दोन्ही देशांतील लोक सहा ते आठ इंच उंचीचे होते. पण त्यांचीं घरें, राज्य-व्यवस्था व भावना या आपल्याप्रमाणेंच मानवी होत्या.

त्यांच्यांतील कटुतेमुळें माझ्यावर प्राणसंकट ओढवणार हें दिसतांच मीं सुटकेचा प्रयत्न निकरानें केला आणि ईश्वरी कृपेनें मला यश येऊन मी इंग्लंडला, माझ्या मायदेशांत, आपल्या मुलाबाळांत येऊन राहिलों. मी लिलिपुट किंवा ब्लेफुस्को येथें रहाण्यांत, महत्त्वाचा धोका दोन्ही बाजूंनीं होता.

लिलिपुट व ब्लेफुस्को येथील हजारों लोकांचें अन्नपाणी रोज मी एकटा रिचवीत असे. माझी अवाढव्य शरीरयष्टि व त्या देहाला लागणारें अन्न–वस्त्र–पाणी

यांचा सतत पुरवठा करणें या दोन्ही देशांना शक्य नव्हतें ! दुष्काळाला तें आमंत्रणच होतें !

म्हणजे मींहि उपासमारीनें इहलोक सोडला असता व तो चिमुकला देशहि रसातळास गेला असता. सर्व बाजूंनीं विचार करतां ईश्वरानें त्या दोन्ही चिमुकल्या देशांना व मला एक भयंकर तितकाच विलक्षण अनुभव देऊन शहाणें केलें.

मिळालेल्या शहाणपणाबरोबर माझा गर्वहि वाढला होता; ह्यांत शंकाच नाहीं. मीं एकट्यानें त्या छोट्या राष्ट्रांना घाबरविलें. मी मोठा व तीं खुजीं माणसें असा गर्व मला झाला.

पण गर्वाचें घर खालीं होतें !

ईश्वरानें मला अशा प्रचंड मानवांचे देशांत नेऊन सोडलें, कीं माझा गर्व हरण झाला. मी एक क्षुल्लक, क:पदार्थ, जंतु आहें, याची मला जाणीव तीन वर्षेपर्यंत झाली. ब्रॉबडिंगनॅगच्या, राक्षसी आकाराच्या मानवांचे देशांत मी लिलिपुटच्या ठेंगूजीहून लहान ठरलों.

लिलिपुट व ब्रॉबडिंगनॅग या दोन्ही देशांतील अनुभव जमेस धरतां, मानवाचें क्षुद्रत्व माझ्या मनास पटूं लागलें. आपण उगाचच गर्व करतों, युद्ध करतों, बढाया मारतों, पण हें सर्व व्यर्थ आहे.

हे विचार करतांना, मानवाच्या अव्यवहारी बुद्धीचें प्रदर्शन पाहण्याचा, देखावा मोठा पण सत्व कांहींच नाहीं, असे देश पाहण्याचा मला योग येईल हें माझ्या स्वप्नांतहि आलें नाहीं !

परंतु–ब्रॉबडिंगनॅगच्या सफरीनंतर मला उडत्या बेटांच्या देशाला अचानक पोहोंचण्याचा योग आला व मानवी–मनाबद्दल माझें मन विटलें ! अव्यवहारी, पोकळ मानव पाहिला !

तेथून चार देश पाहून मी ही तिसरी सफर संपवून इंग्लंडला परत आलों.

मग मनांत विचार थैमान घालूं लागले. मानव श्रेष्ठ कीं पशु श्रेष्ठ ? पशूंचें राष्ट्र–सुधारलेल्या मनाचे पशु राहतात व राज्य करतात, असा प्रदेश–असेल काय ? मी तो देश पाहीन काय ?

या तीव्र विचारांनीं माझें डोकें भ्रमलें असतांनाच चौथी सफर करण्याचा योग आला आणि ‘ हूं हूं ’ देशांत मी जें पाहिलें तें जन्मभर विसरूं शकलों नाहीं.

कारण, तेथें मानव क्षुद्र असून, बुद्धिमान घोडे राज्य करीत होते. मनुष्य हा तेथें त्यांचा गुलाम होता.

उडत्या बेटांच्या देशाला ‘ लापुटा ’ हें नांव होतें, हें मी सांगावयाचें विसरलों. लापुटा नंतर, बाल्नीबार्बी हा भंपक विद्वानांचा देश मीं पाहिला.

त्यानंतर, 'ग्लब–डब–रिग्' हा जादूगारांचा प्रदेश मला पहावयास मिळाला.

सर्वांत किळस आली ती 'अमर' राहण्याचा अट्टाहास करणाऱ्या 'लग्नाग्' देशाची.

तिसऱ्या सफरींत मला चार देश पाहतां आले.

चौथा देश हूं हूं ! !

या सर्व सफरींनीं तुमचें मनोरंजन होईल, यांत शंका नाहीं. पण मला मात्र फार विचार करायला लावणाऱ्या या सफरी होत्या. असो. आतां तिसरी सफर सांगून निरोप घेतों.

गलिव्हर

# गलिव्हरची तिसरी अद्भुत सफर

१

सिंदबादनें सात सफरी केल्या. प्रत्येक सफरीनंतर, 'नको तें साहस' असें वाटून ख्यालीखुशालींत दिवस घालविले कीं पुन्हां प्रवास करण्याची उबळ त्याला येई.

माझ्या दुसऱ्या सफरीनंतर तिसरी सफर मी करेन याबद्दल माझ्या मनांत विचारहि नव्हता. परंतु–

मन व दैव निराळेंच घडवीत होतें.

मी दुपारीं स्वस्थ विश्रांति घेत बसलों असतांना माझ्या नांवाचा पुकारा करीत कुणीं आल्याचें माझ्या पत्नीनें मला सांगितलें.

तो एका गलबताचा कॅप्टन होता.

'बोला कॅप्टन. काय हुकूम ?' मीं विचारलें.

'तुम्ही गलिव्हर ? बरोबर ?'

'होय. तुम्ही योग्य त्याच घरीं आलांत. हें माझेंच घर. मी डॉक्टर– (शस्त्रवैद्य–सर्जन–) आहें.'

'होय–होय ! म्हणूनच मी तुमचा शोध घेत येथपर्यंत आलों. आमचें काम आहे.'

'बोला ना.'

'म्हणजे असें कीं आमचीं अनेक गलबतें आहेत. त्यांतील एक जहाज चारच दिवसांनीं हिंदुस्थानकडे जाण्यास निघेल. मी त्याच जहाजावर असेन. मला एका सर्जनची जरुरी आहे.'

'आलं लक्षांत. पण मी आतां सुखांत रहावें म्हणतों. जी मीठ-भाकर सुखानें मला मिळत आहे, त्यांत मी समाधान मानतों.'

'पण मी तुम्हांला कमी पगारावर या म्हणत नाहीं. चार वर्षांचा पगार तुम्हांला एका वर्षांत मिळेल. तुमच्या मुलाबाळांचें कल्याण होईल. विशेषत: आमची गरज लगेच भागेल. आम्हांला तुमची अत्यंत जरूर आहे.'

'दुसरा वैद्य नाहीं काय?'

'आहे; पण तुमच्यासारखा अनुभवी, पूर्वेकडे सफर केलेला नाहीं. तुमच्या अनुभवाची किंमत म्हणूनच हा चौपट पगार आम्हीं ठरवला आहे. तुमची कीर्ति—'

'बरं तें असूं दे! तुम्हीं उद्यां या. मी नक्की काय तें सांगतों.'

कॅप्टन दुसरे दिवशीं आला, तेव्हां मीं घरच्या सर्वांची समजूत घालून त्यांची संमति युक्तीनें मिळविली होती. चौपट पगार व सफर या दोन गोष्टींचें मला

आकर्षण वाटलें !

'मी तयार आहें.' मीं कॅप्टनला म्हटलें.

'फार छान झालें. माझें काम झालें.'

## २

हिंदुस्थानपर्यंत आम्हीं सुखरूप सफर केली. हिंदुस्थानच्या पश्चिम किनाऱ्यावरील, सुरत, मुंबई, कोचीन, कालिकत या बंदरांत आमचें जहाज थांबत थांबत व मालाची देवघेव करीत सिलोनला पोहोंचलें.

सिलोनला वळसा घालून पुन्हां मद्रासमार्गें कलकत्त्यास आम्ही येऊन थडकलों. तेथील कालिमंदिर पाहिलें. बकाल वस्ती पाहिली. मुसलमान सुभेदारांचे ताब्यांत बंगाल प्रांत त्यावेळीं होता.

मग रंगूनला गेलों. बुद्धाचे स्तूप पाहिले. ब्रह्मदेशचे स्त्री-राज्य पाहिलें आणि नंतर चीनला जाण्यासाठीं गलबत हांकारलें. अतिपूर्वेकडे निघालों.

संकटांना प्रारंभ झाला. चीनला पोहोंचण्याचा योग नव्हता असें दिसतें. वाटेंतच चांचे लोकांनीं आमच्या जहाजावर भयंकर हल्ला केला. त्यांनीं इतक्या शिताफीनें कबजा घेतला कीं, विरोध फारसा झालाच नाहीं.

पण मला खुमखुमी असल्यानें व मी सावध असल्यामुळें ताबडतोब तलवार उपसून त्या चांच्यांना व

त्यांच्या मुख्याला विरोध केला.

मग माझा हा पुढाकार पाहतांच आमच्या इतर खलाशी मंडळींना अवसान आलें व त्यांनीं आपापल्या परीनें लढण्यास सुरुवात केली. जमेल तितकें युद्ध केलें.

पण हा विरोध तोटका पडला. आमचा पूर्ण पराजय झाला.

सर्वांमध्यें, या चांच्यांचा व त्याच्या पांच टोळ्यापैकीं एका टोळीच्या नायकाचा माझ्यावर फार राग राहिला. आमचे इतर खलाशी वगैरे त्याच जहाजावर राहिले. त्यांच्यापासून मला वेगळें काढण्यांत आलें.

मग चांचे लोकांचा कप्तान व ज्या टोळीच्या नायकाशीं माझी जोरदार जुंपली होती तो नायक, यांचें आपापसांत बोलणें झालें.

नायकानें कप्तानाला सल्ला दिला, 'याला ठार मारावें. यानें आम्हांला विरोध केला. खूप त्रास दिला.'

तेव्हां कप्तान त्याला म्हणाला, 'तो भ्याड नाहीं, शूर आहे. म्हणून लढला.'

'पण तो शत्रु आहे. त्याला शासन करायला हवें.'

'नायक! आपण त्याला शूर माणसासारखें वागवूं. आपण त्याला एका होडींत ठेवूं. थोडे अन्नपाणी त्यांत ठेवूं. मग ती होडी समुद्रांत सोडूं. त्याचें नशीब त्याच्याबरोबर!'




'चालेल, चालेल !' तो नायक आनंदानें म्हणाला. माझे हाल होणार याचें समाधान त्याला आतां लाभणार होतें.'

आणि मला त्याप्रमाणें होडींत ठेवून ते चांचे लोक आमचें गलबत घेऊन पसार झाले.

मीं दैवावर हवाला ठेवून शिडें उभारलीं. मग मी विचार करूं लागलों.

पूर्वेकडील या समुद्रांत जवळ जवळ अशीं बरीचशीं बेटें असतात असें मीं प्रवासी व खलाशी यांचे तोंडून ऐकलें होतें. अशाच एकाद्या बेटावर जावें, तेथून दुसऱ्या चांगल्या वस्तीच्या बेटावर मुक्काम करावा, मग नीट माहिती घ्यावी आणि परत आपल्या देशास

हळहळू जावें असा मीं बेत केला.

त्याप्रमाणें, वाऱ्याची मदत घेऊन शिडें उभारून मी होडी वल्हवीत जाऊं लागलों. एक दिवसानंतर मला एक बेट दिसलें.

होडी त्या बेटाकडे मीं वळविली. सायंकाळ झाली. मी बेटावर उतरलों. खूपसे खडक होते. खडकांच्या गुहा तयार झाल्या होत्या.

एका गुहेंत मी शिरलों. बरोबर सामान होतेंच. ती रात्र त्या गुहेंत काढली.

पहांटे मला जाग आली. पण अंग आंबलें होतें. तसाच थोडा वेळ झोंपून राहिलों. मग किंचित् हुशारी वाटतांच उठलों.

चकमकीनें विस्तव पेटवला. त्यावर माझ्या न्याहारीचे पदार्थ तयार केले. न्याहारी झाली. आतां या ओसाड बेटावर पाहणी करून पुढचा मार्ग आक्रमावा असें मीं ठरवलें.

त्याप्रमाणें मी त्या बेटावर भटकूं लागलों. थोड्या वेळानें एकाएकींच माझ्याभोंवतीं अंधार पडल्यासारखें झालें. भर दुपारीं एकदम गडद सांवलीच पडली. हें मला नवलपूर्ण वाटलें.

मीं आकाशाकडे पाहिलें आणि मला एक मोठा आश्चर्याचा धक्का बसला ! !

एक प्रचंड बेट माझ्या डोक्यावरून मैलभर

उंचीवरून तरंगत तरंगत जात होतें.

मी लगेच खिशांतून दुर्बिण काढली व त्या जवळून जाणाऱ्या बेटाकडे त्यांतून पाहिलें.

अनेक लोक त्या बेटावर मला हिंडतांना दिसले. या उडत्या बेटावर हे लोक गेले तरी कसे? हें बेट हवेंत उडत राहण्यासाठीं काय शास्त्रीय योजना होती?

माझे मनांत भराभर विचारामागून विचार व कल्पना येऊं लागल्या.

मला सर्वांत एक नामी कल्पना सुचली. ती माझ्या स्वतःच्या सुटकेचीच!

मी जोरानें आरडाओरडा करून त्या बेटावरील लोकांचें लक्ष वेधून घेण्याचा प्रयत्न चालवला. त्याचवेळीं अंगांतील अंगरखा काढून तो हवेंत उडवून त्यांना खूण केली.

– माझ्या प्रयत्नास यश आलें.

त्यांच्यापैकीं कांहींचें लक्ष माझ्याकडे गेलें व बेटावर लगबग झालेली मला दिसली. बहुधा त्यांच्या अधिकाऱ्याचे नजरेस माझ्या खुणा त्या लोकांनीं आणल्या असाव्यात.

मग तें बेट माझ्या डोक्यावर आलें.

बेटावरून एक बळकट दोर खालीं सोडण्यांत आला. ह्या दोराचे टोंकास एक खुर्ची बांधली होती.

मी त्या खुर्चीवर माझ्या सामानासह बसलों.

माझा हा अनुभव नवीन होता. त्या लोकांनीं मला वर ओढून घेतलें. मी त्या हवाई बेटावर पोहोंचलों.

## 3

त्या बेटावर मी आतां राह्यचें ठरवून माहिती घेऊं लागलों. बरेच दिवस तिथें राहिलों. हें हवाई बेट म्हणजे ज्योतिषी लोकांचें होतें. आकाशांतील ग्रह, नक्षत्र, तारे यांचे वेध घेणें व गणित करणें यांतच सर्व लोकांचा वेळ जात असे.

यांच्यापैकीं प्रत्येकाचा एक डोळा तिरपा होता. जास्त चौकशी करतां मला कळलें कीं, यांचा अभ्यासच याला कारण आहे !

सतत ताऱ्यांकडे पाहिल्यामुळें यांचा एकेक डोळा तिरपा झाला होता. तो वर ओढलेला दिसे.

या गणिती लोकांच्या मानाहि वांकडया व वर झुकलेल्या अशा होत्या. त्याला कारण ताऱ्यांकडे पाहण्याचें ह्यांचें हें वेड होय. किती विलक्षण नाद व त्याचा परिणामसुद्धां किती चमत्कारिक !

या लोकांना ज्योतिष व गणित यांचें विलक्षण वेड लागलेलें मीं पाहिलें. प्रत्येक व्यवहारांत या वेडाचा शिरकाव झालेला दिसला.

त्यांचे कपडे पाहिले; त्यांच्यावर त्रिकोन, चौकोन, पंचकोन, षट्कोन दिसले. गोल लंबवर्तुळें, अर्धवर्तुळें, समांतरभुज चौकोन, पतंगांच्या आकृति, वगैरे त्या




कपड्यांवर काढलेल्या दिसल्या.

मी आश्चर्यानें स्तब्ध बसलों.

दुसरा धक्का बसला जेवणाचे वेळीं. भूमितीच्या विविध आकृतींची गुंतागुंत केलेले गोड व तिखटमिठाचे पदार्थ ताटांत वाढले गेले.

मी भराभर जेवत असें.

पण माझ्याबरोबरचे लोक समाधि लागल्यासारखे वागत. त्यांच्याजवळ एक खास चवरीवाला उभा राही. तो त्यांना चवरीनें कानावर नाजुक फटका मारून 'जेवण आटपा. मग विचार करा.' अशी आठवण देत असे. मग कसेंबसें त्यांचें जेवण आटोपत असे.

गणिताच्या गुंगींत जेवण, कपडे यांची या लोकांना

मुळींच शुद्ध रहात नसे, हें मीं चांगलें ध्यानांत ठेवलें. पदोपदीं हा अनुभव मी घेत होतों.

अति हुषार व गणिती म्हणून यांच्याबद्दल मला फार आदर वाटूं लागला.

पण—माझ्या हळूहळू लक्षांत आलें कीं ह्यांची हुषारी कागदावर गणित व त्यांतील उदाहरणें सोडवण्यांतच होती. व्यवहार ? अं हं !

व्यवहाराच्या नांवें भोपळ्याएवढें पूज्य !

सरळ करावयाच्या गोष्टी हे लोक गणितानें सोडवावयाचा प्रयत्न करीत. गुंतागुंतींत शिरत. किती वेडेपणा हा.

सामान्य माणूस व्यवहारी बुद्धीनें जें काम एक मिनिटांत करील, त्याला यांना एकेक तास, कधीं एकेक दिवस लागे.

मी तर पाहूनच कंटाळलों.

वेंगळ्‌पणाचा मला कंटाळा आहे आणि या वेडपट अव्यवहारी लोकांत प्रत्येक क्षण मला वैताग आणीत होता. गणित लवकर न होण्याचें कारण जराशी चूक झाली कीं पुन्हां पहिल्यापासून तपासावें लागे. मग दुप्पट तिप्पट वेळ जाई. राम राम !

ह्यांच्या ह्या चुकांची निशाणी तर प्रत्येक व्यवहारांत व वस्तूवर दिसत होती. तिरप्या डोळ्यांच्या या गणिती लोकांनीं घरें बांधलीं तीं विलक्षण !

चुका झाल्यामुळें घरें वेडीवांकडी, तिरपीं अशीं बांधलेलीं दिसत होतीं. ओबडधोबडपणाहि त्या घरांना आलेला होता. सौंदर्य, नाजुकता याचा लवलेशसुद्धां या घरांकडे पाहून लक्षांत येत नव्हता.

विशोभित, कसेतरी शिवलेले कपडे यांचे अंगावर पाहतांच मला हंसूं व त्याचप्रमाणें कींव आली. काय हें आयुष्य ह्या लोकांचें !

कामधंदा करतांना हे लोक तर मला दिसतच नव्हते. मग जगतात कसे ? मला अत्यंत आश्चर्य वाटलें.

मी माहिती विचारूं लागलों. संभाषणें व संवाद यांतून मला माहिती कळली.

'या देशाचें नांव ?'

'लापुटा.'

'राजेसाहेब कुठें राहतात?'

'या उडत्या बेटावर. बाकीचे लोक जमिनीवर (पृथ्वीवर) असलेल्या शहरांतून राहतात.'

'राजेसाहेबांबरोबर आणखी कोण कोण या बेटावर राहतात ?'

'राजेसाहेब ज्यांच्यावर खूष आहेत असे विद्वान, पंडितरत्न व गणिती या बेटावर आहेत. त्याशिवाय सरदार, मानकरी, वगैरे दरबारी लोकसुद्धां येथें रहातात.'

'या बेटाचा व्याप खूपच मोठा आहे का ?'

'होय. त्याचा मोठा उपयोग आमचे राजेसाहेब करतात. खालीं असलेल्या शहरांपैकीं जीं शहरें किंवा जे प्रदेश बंड करून राज्यांत दंगल माजवतात किंवा क्रांतीच्या घोषणा करतात त्यांचा बीमोड या बेटाच्या उड्डाणानें करतां येतो.'

'तें कसें काय ? बेट जर शहरावर आदळलें तर लोक मरत असतील.'

'अंहं ! तसें नाहीं ! हें बेट प्रचंड आहे. त्याची सांवली सारखी कित्येक दिवस जर या प्रदेशावर राहिली तर प्रकाश व उन्ह यांना अडथळा येतो. खालच्या प्रदेशांतील लोकांना प्रकाश, पाऊस कांहीं मिळत नाहीं. जगणेंच अशक्य होतें. मग ते बंडखोर शरण येतात.'

'म्हणजे हें तरंगतें बेट बंडखोरांच्या प्रदेशावर कांहीं दिवस स्थिर करून ठेवण्याचा हा परिणाम !'

'अगदीं बरोबर. असेंच ! शिवाय इतर शहरांना या प्रदेशाशीं संबंध ठेवण्यास मनाई केली जाते. या प्रकारें सर्व बाजूंनीं नाकेबंदी केल्यावर हे बंडखोर शरण येतात.'

हा आमचा संवाद चालूं असतांना तरंगतें बेट एका शहरावर येऊन स्थिर झालें. मी आतां पुढें काय होतें तें पाहूं लागलों.

बेटावरील लोकांनीं भराभर पेटचा, पेटारे, यांना दोर बांधून शहरांत सोडले.

मग शहरांतील लोकांनीं भराभर त्यांत निरनिराळी सामुग्री भरली. यांत अन्नसामुग्री, कपडे वगैरे नेहमीं लागणारा माल व पदार्थ भरपूर प्रमाणांत होते.

मालाचे भरलेले पेटारे वर ओढून घेण्यांत आले. मग आमचें उडतें बेट पुन्हां पुढें मार्गी लागलें. (याप्रकारें अन्न व वस्त्र यांचा प्रश्न सुटत होता हें मीं पाहिलें.)

वरील संवाद प्रत्यक्ष घडण्यास फार वेळ लागला, हें मात्र मला सांगावयाचें आहे. कारण ह्या उडत्या बेटावरील हीं माणसें विक्षिप्त व घुमीं होतीं.

आपण चार वेळां एक प्रश्न विचारावा तेव्हां एक शब्द त्यांचे तोंडून बाहेर पडे. मी विलक्षण चौकस व बोलका, आनंदी प्राणी! माझें कसें काय या लोकांशीं जमणार?

आतां मीं 'लापुटा' बेट सोडण्याचें ठरवलें. परंतु तत्पूर्वी एक शंका माझ्या मनांत सारखी येत होती.

हें उडतें बेट. इतकें अवाढव्य. माणसें याच्यावर राहतात. पण हवेंत हें बेट तरंगत ठेवण्याचें कार्य कसें चालतें? त्याला गति व वळण कसें मिळतें?'

मग मींच संशोधन करायचें ठरवलें. कागदावर त्या बेटाची आकृति व नकाशा काढला. गतीचे सिद्धांत




व लोहचुंबकाचे सिद्धांत एका बाजूस मांडले. मग बराच विचार केला.

अंधुक कल्पना मनांत शिरूं लागली.

त्या कल्पनेवरच विचार करायचें ठरवलें. मग स्वतः त्या बेटाच्या मध्यभागांतून हिंडलों. अगदीं दोन टोकांशीं जाऊन लोहचुंबकीय नियमांचा पडताळा घेतला.

माझा शेवटीं असा निष्कर्ष निघाला कीं—

(१) लोहचुंबकाचा एक प्रचंड सुळका ह्या बेटाचे आंतील बाजूस असला पाहिजे.

(२) ह्या बेटाचें खालील जमीन ही उलट प्रकारच्या कांहीं शक्तीची बनलेली असावी.

(३) त्यामुळें, लोहचुंबकाचें हें बेट खालच्या जमिनीस न लागतां अधांतरीं राहत होतें.

लोहचुंबकाच्या कण्याला योग्य त्या दिशेकडे फिरवून ह्या बेटाला वाटेल तशी गति देतां येत होती. (माझ्या सिद्धांताचे व निष्कर्षाचे प्रत्यक्ष प्रत्यंतर मिळालें व समाधान झालें.)

माझें समाधान झाल्यावर मीं बेट सोडायचें लगेच ठरवलें. 'उडत्या बेटाच्या' राजाच्या निवासस्थानीं मी गेलों. मीं त्या राजाला परवानगी मागितली. 'मला आतां खालच्या प्रदेशांत जाऊन तेथील रीतीरिवाज पाहावयाचे आहेत.'

'जरूर पहा. त्या देशावर आमचाच अंमल आहे. त्या देशाचें नांव तुम्हांला माहीत आहे काय ?'

'नाहीं.'

'वाल्नीबार्बी म्हणतात त्या देशाला. त्याच्या राजधानीचें नांव आहे लाडागो.'

'मी सर्व लक्षांत ठेवतों. मला तेथें जाण्याकरतां आपल्या दरबारतर्फे शिफारसपत्रें मिळालीं म्हणजे जास्त ओळखपत्रांची जरूर तेथें लागणार नाहीं.

'माझें योग्यप्रकारें स्वागत होईल व मला जी माहिती हवी आहे त्याबद्दल कोणी संशय व्यक्त करणार नाहीं. मोकळेपणानें सर्व कांहीं होईल.'

मीं याप्रकारें खुलासा व विनंति केली.

राजेसाहेबांनीं त्या विनंतीला मान देऊन भरपूर

शिफारसपत्रें दिलीं. मग मला पूर्वीच्या पद्धतीनें खालील प्रदेशांत उतरवण्याची सोय केली गेली.

एका बळकट दोराला बांधलेल्या खुर्चीत मी बसलों. तो दोर हळूहळू खालीं सोडण्यांत आला. मग योग्य ठिकाण येतांच, मी 'लाडागो' या राजधानीच्या भूमीवर उतरलों.



माझ्या जवळच्या शिफारसपत्रांचा मला चांगला उपयोग झाला. लाडागोला उतरल्यावर मी प्रधानजींचा पत्ता विचारीत त्यांच्या घरीं पोहोंचलों.

प्रधानजींना माझी शिफारसपत्रें दाखवलीं. त्यांनीं तीं पाहून स्मित केले व मान हलवली.

'येथें जें जें पाहण्यासारखें आहे तें तें मला दाखवण्याची व्यवस्था करावी अशी माझी आपल्याला विनंति आहे.'

'तुम्हांला सर्व कांहीं दाखविण्यांत येईल.' त्यांनीं आश्वासन दिलें. माझें स्वागत उत्तमप्रकारें करून, बडदास्त राखून मग मला सर्व कांहीं दाखविलें.

त्यांत महत्त्वाची एकच संस्था मला वाटली. ती एक पाठशाळा किंवा संशोधनसंस्था होती. त्या प्रचंड इमारतींत बरेच विभाग होते. अनेक विद्वान संशोधन करीत रात्रंदिवस तेथेंच मुक्काम करून होते.

विद्वान वाटणारे किंवा दिसणारे ते लोक मला

भंपक वाटले. मला तिटकाराच आला त्या पाठशाळेचा व तेथील लोकांचा.

कां, तें आतां सविस्तर ऐका. तुमचें मत माझ्या-सारखेंच होईल याबद्दल मला खात्री आहे. विलक्षण शोध लावावा या हिरीरीनें हे लोक अव्यवहारी बनून आपला वेळ संशोधनाचे नांवाखालीं फुकट घालवीत होते. उदाहरणार्थ :–

मी एका दालनांत गेलों. तेथें प्रचंड ढीग. एका बाजूस लावले होते. ते ढीग बर्फाचे होते. मग त्या ढिगांतून बर्फाचे चौकोनी तुकडे एका यंत्रांत घालून त्यांत कसलेंतरी मिश्रण ओतण्याचा प्रयोग सुरू होता.

'हें काय आहे ?' मीं विचारलें.

'संशोधन.' उत्तर आलें संशोधकाकडून.

'कशाचें ?'

'बंदुकीची दारू तयार करण्याचा हा प्रयोग आहे.'

'कशापासून ही दारू तयार करणार ?' हें ऐकतांच माझ्याकडे त्या संशोधकानें इतक्या चमत्कारिक-पणें पाहिलें कीं कांहीं विचारूं नका. त्याच्या नजरेचा अर्थ होता, 'एवढी सरळ गोष्ट लक्षांत येत नाहीं ? किती लहान आहांत बुद्धीनें. विचार प्रगल्भ नाहींत. बुद्धि विकास पावलेली नाहीं तुमची.'

मीं तरीहि म्हटलें, 'आपण मला खुलासा करावा.

मी अज्ञानी आहें.'

मला माझा हेतु साध्य करावयाचा होता, म्हणून माझ्याकडे कमीपणा घेऊन मीं पुनः प्रश्न विचारला. मग माझ्या अज्ञानाची कींव करीत संशोधक म्हणाले,

'मी जगांत हा नवा शोध लावत आहें. आजपर्यंत कुणीच तो प्रयत्न केला नाहीं. बर्फापासून बंदुकीची दारू ( ॲम्युनिशन फ्रॉम आइस् ) करण्याचा हा प्रयोग आहे.'

मी मान हलवली. तेथून निरोप घेतला. बर्फापासून दारू कधींच बनणार नाहीं, देवाच्या देवालासुद्धां हा चमत्कार घडवतां येणार नाहीं. मूर्खपणाच तो !

दुसऱ्या दालनांत गेलों. तेथें चमत्कार नव्हता, पण चमत्कारिकपणा होता. आढ्यास बळकट असा एक दोरा बांधलेला होता. अधांतरीं असलेल्या टोंकास एक छानदार एक मजली घर टांगलें होतें. गच्ची, कौलारू छप्पर वगैरे होतें.

'येथें कोणतें संशोधन आहे ?' मी विचारलें. मला उत्तर देणारा संशोधक मोकळेपणानें म्हणाला, 'मी नवा शोध लावतों आहें. जगाच्याविरुद्ध जायला मला आवडतें.'

'आपण जगाच्याविरुद्ध काय शोध लावणार आहांत ? निश्चित नवीन असणार.'

'होय. होय ! नेहमीं घरें कशीं बांधतात तें

तुम्हांला माहीत आहेच. कशीं बरं बांधतात ?'

'जमिनींत पाया खणायचा आणि मग तो दगडांनीं पक्का भरून काढून त्यावर इमारत बांधत वर वर जायचें.'

'बरोबर, बरोबर ! मी या रूढीच्या व नियमाच्याविरुद्ध लोकांना उपदेश करीत आहें. हें मॉडेल पाहिलेंत. याप्रमाणें प्रथम घराचा वरचा मजला बांधायचा. मग हळूहळू खालचे मजले बांधीत बांधीत पायापर्यंत यायचें. अगदीं सोपें काम.'

मला तो संशोधक वेडाच वाटला. किती चमत्कारिक व अव्यवहार्य गोष्ट तो लोकांना करायला सांगत होता ?

'मग लोक तुमच्या संशोधनाप्रमाणें घरें बांधीत असतील ! किती घरें झालीं बांधून या तुमच्या नव्या पद्धतीनें ?' मीं विचारलें.

या प्रश्नावर त्यानें तोंड वेडेंवांकडें केलें.

'छे ! मी जें एवढें जीव तोडून या लोकांना सांगतों आहें, त्यावर त्यांचा विश्वास नाहीं. एकानेंहि हा प्रयोग केला नाहीं. लोक हंसत नाहींत. पण म्हणतात, 'आम्हांला जमत नाहीं. पण प्रयत्न करूं बरं का.' मी निराश झालेलों नाहीं. माझा प्रचार चालू आहे.

'लोकहो, कळस प्रथम, मग पाया.'

मीं हें दिव्य तत्त्वज्ञान ऐकलें. त्या संशोधकास

नमस्कार करून पुढें निघालों. आणखी कोण कोण वेडे भेटणार असा माझ्या मनांत विचार आला.

तिसऱ्या दालनांत मीं प्रवेश केला.

या तिसऱ्या दालनांत एक संशोधक होते त्यांनीं कोळ्यांचीं जाळीं जमवलीं होतीं. एका यंत्रावर तीं जाळीं बसवून खटपट चालूं होती.




'आपण कसलें संशोधन करीत आहां तें सांगण्याची कृपा करावी.' मीं अतिनम्र होऊन त्या विद्वान माणसाला विचारलें.

'या कोळ्यांच्या जाळ्यांपासून कापड तायर

करतां येईल असें मला वाटतें. त्याबद्दल माझी खटपट गेले पांच वर्षें चालू आहे. अजून यश नाहीं. पण येईल यश.'

'छान, छान.' मी म्हणालों व त्या अयशस्वी संशोधकाचा निरोप घेतला. विचार केला, हें संशोधन जन्मांत जमणार नाहीं. वेळ फुकटच जाणार. भंपकपणाच आहे सर्व !

पुढच्या दालनांत गेलों.

तेथें मोठे लांकडी ठोकळे, मुळाक्षरांचे लहान ठोकळे, दांडा असलेलें यंत्र, तबकड्या, मोठे सांचे, कागद वगैरे साहित्य दिसलें.

मी जवळ जाऊन पाहूं लागलों. प्रधानजी मला म्हणाले, 'ह्या यंत्राचा शोध लावणारे हे लेखक.' मीं तेथेंच खटपट करणाऱ्या त्या खोल डोळ्यांच्या माणसाकडे पाहिलें.

या लेखकाला कसला शोध लावायचाय हें मला कळेना. प्रश्नार्थक मुद्रेनें मीं यंत्राकडे व मग त्या लेखकाकडे पाहिलें.

त्यानें मान हलवली व मग यंत्राची माहिती सांगावयास सुरवात केली.

'नवीन शब्द यांत्रिक क्रियेनें आपोआप तयार करण्याचा प्रयोग मी करीत आहें. हें प्रचंड यंत्र म्हणजेच हा माझा प्रयोग. "लेखक–यंत्र" हें त्याचें नांव.'

मी उत्सुकतेनें ऐकूं लागलों.

'सर्व इंग्रजी मुळाक्षरें लांकडाच्या या चौकोनी सांच्यांत वेगवेगळ्या ठिकाणीं प्रथम बसवायचीं. प्रत्येक अक्षराला एक दांडा बसवला आहे. तो फिरवायचा.'

मी पुढें ऐकूं लागलों.

'हा दांडा मनाला येईल त्या त्या अक्षराला फिरवून पाह्यचा. प्रत्येक वेळीं विशिष्ट अक्षरें एकापुढें एक उमटतील अशी ह्या कागदावर व्यवस्था केली आहे.'

'मग ?' मीं विचारलें.

'नवे नवे शब्द तयार होतील ते आपोआप. त्या सहज तयार झालेल्या शब्दांतून मी लेखन करीन. ते सर्व शब्द नवीन असणार. म्हणून माझें लेखन व लेख-सुद्धां एकदम नवीन—( ब्रँड न्यू ) असतील. कां, कसें काय वाटतें ? कल्पना छान आहे ना ?'

'एकदम नवीन !' मीं उत्तेजनपर दोन शब्द उच्चारले. मला हें कळेना कीं निरर्थक हा काळाचा अपव्यय व बुद्धीबरोबर पैशाचाहि निरर्थक खर्च कशा-साठीं हीं माणसें करीत आहेत ?

'लाडागो' राजधानींतील या पोकळ विद्वान मंड-ळींचा व त्यांच्या भंपकपणाचा निरोप घेण्यास मी उत्सुक झालों. आपल्या इंग्लंड देशास जावें असें मीं ठरवलें, तरीसुद्धां आणखी दोन देशांना मीं धांवती भेट दिली.

प्रथम ज्या देशास गेलों त्या देशाचें नांव 'ग्लब–डब–रिग !'

## ५

ह्या देशाला मीं भेट दिली आणि लक्षांत आलें कीं, येथें जादू, जादूगार, भुतें यांचें प्राबल्य आहे.

ग्लब–डब–रिगच्या दरबारांत पोहोंचलों. तेथें नोकर–चाकरांचा गजबजाट नव्हता. मला आश्चर्य वाटलें. नोकरांना सांगावयाचीं कामें टाळी वाजवून, संकेत असलेले शब्द, परवलीचे शब्द उच्चारले जातांच होत असत.

पाणी आण, सरबत आण, कलमदान आण वगैरे कामें भुतांकरवीं केलीं जात. भुतें दिसत नसत. अदृश्य असत. पण कामें चटकन् होत.

मला आश्चर्यांत पडलेला पाहून एकानें म्हटलें, 'तुम्हांला गतकालांतील कुणा मृत विद्वान व्यक्तीला, राजेमहाराजांना किंवा धर्मगुरूंना जर बोलावणें धाडायचें असेल ...'

'बोलावणें आणि ऐतिहासिक व्यक्तींना ? मला अर्थ समजला नाहीं !'

'त्यांत समजायला अवघड काय आहे ? ह्या

आमच्या ग्लब–डब–रिग देशांत जादूनें आम्ही मृतात्म्यांशीं बोलूं शकतों. त्यांना आवाहन केलें तर ते येतीलच.'

'मला दिसतील का ?'

'जरूर, पण अंधुक आकृतीच्या स्वरूपांत. बोला. कुणाला बोलावूं ?'

माझ्या नजरेसमोर शेक्स्‌पिअर आला, एलिझाबेथ राणी आली, मार्टिन ल्यूथर आला, बडे नट; लेखक आले. मीं नांवें सांगितलीं.

आणि त्या त्या व्यक्तींना आवाहन करून माझ्यासमोर आणण्यांत आलें. मीं शेक्सपिअरला पाहिलें. त्याच्याशीं बोललोंदेखील. क्रॉम्वेल व वॉलपोल यांना प्रश्न विचारले.

अंधुक, धुक्याच्या स्वरूपांत या थोर व्यक्ति मजसमोर आल्या होत्या. जादूगारांचा हा देश. तेथें गूढ, रहस्यमय वातावरण पसरलेलें मला आढळलें. मनांत उत्सुकता व भीति यांचें मिश्रण झालेलें असायचें.

कामें मात्र झटपट, झटपट होत. भुतेंच हाताशीं असल्यावर वेळ लागतोच कशाला ? तासाचें काम एका मिनिटांत ! अनेक दिवसांचीं कामें कांहीं तासांतच

होत.

शेतपेरणी, धान्याची रास करणें, घरें बांधणें, रोजचे कपडे व भांडीं स्वच्छ करणें हीं कामेंसुद्धां भुतांकरवीं करविलीं जात.

स्वतः मेहनत खूप करावी, कधीं कंटाळा आला तर विश्रांति घ्यावी, पुन्हां ताजेंतवानें व्हावें व कामास लागावें असें माझें प्रामाणिक मत. त्यामुळें मृतात्म्यांशीं बोलणें मला आवडलें असलें तरी जादूनें काम करणें व ऐदी बनणें हें मात्र माझ्या वृत्तींत बसण्याजोगें नव्हतें.

अतिशय अवघड काम क्वचित् प्रसंगीं मौज म्हणून करून घेणें निराळें. पण—येथील कारभार कांहीं विलक्षणच !

मीं जादूनगरीच्या देशाला रामराम ठोकला व अमरलोकांस गेलों.

## ६

अमरलोक मी म्हणालों तें गमतीनें नव्हे. लग्नाग नांवाच्या देशांत मी गेलों. तेथील एक माणसांची जात अमर आहे असें मीं ऐकलें. त्या मनुष्यांना पहावयास गेलों.

'स्ट्रल्डब्रब' हें त्या जातीचें नांव ! अजब नांव !

अजब देश ! अजब माणसें !

अमर व्हावेंसें कुणाला वाटत नाहीं ? कीर्तिरूपानें माणूस अमर होण्याचा प्रयत्न करतो. त्यांत मौज आहे. आव्हान आहे. त्यांत पुरुषार्थ व पराक्रम आहे.

देह अमर झाला व पुष्कळ कार्य करतां आलें तर फारच छान. कित्येक अपुऱ्या इच्छांच्या पूर्तीसाठीं जोमानें झगडतां येईल. कष्ट करून विजय मिळवितां येईल.

तेव्हां अमरलोकांत जाऊन अमर होण्याची विद्या शिकावी व त्या देशांतील लोकांचा अमाप उत्साह पहावा ही इच्छा व कल्पना मनांत धरून मी गेलों.

योजलें एक ! पाहिलें भलतेंच !

वाचकहो ! फारच चमत्कारिक दृश्य मीं पाहिलें व मनांत धसका घेतला ! ! असलें अमरपण मला नको.

मृत्यु शतपट नव्हे, सहस्रपट चांगला. तो हितकरच आहे हें मला पटलें.

आपल्याकडे माणसें म्हातारीं होऊन मृत होतात. तो निसर्गनियम पाळावा लागतो सर्वांना. येथील व्यक्ति आमच्याकडच्या लोकांपेक्षांहि जरुखड म्हातारी होत.

इतकीं म्हातारीं होत कीं त्यांना ऐकूं येत नाहीं. कान पूर्ण बहिरे. दिसत नाहीं. अगदीं आंधळ्यापेक्षां अंध. दांतांचे ठाणें उठलेलें ! बोलतां येत नाहीं.

पायांतील शक्ति नाहींशी झालेली. म्हणून चालतां येत नाहीं ! !

मग यांना जगण्याचा ह्व्यास तरी कां ? बोलणें नाहीं, चालणें नाहीं, हंसणें नाहीं, जेवणें नाहीं, ऐकणें नाहीं. सर्वच नन्नाचा पाढा.

शेंकडों वर्षें हे हाडांचे सांपळे जगून तरी काय मिळवतात, असा मला प्रश्न पडला. जिवंत असलेलीं हीं प्रेतेंच. त्यापेक्षां मृत्यु बरा असेंच वाटावें पहाणाऱ्याला !

मला भयंकर उबग आला. किळस आली. घृणा आली. अमरत्वाचा तिटकाराच आला. मनुष्याचें अमरत्त्वाचें वेड इतकें भयंकर असतें हें मी प्रथमच पाहात होतों.

पूर्वीं मी मृत्यूला भीत असें. भयंकर कांहीं असेल तर मृत्यु, असें मला वाटे. पण आतां हे जिवंत सांपळे पाहतांच मला मृत्यूबद्दल जिव्हाळा वाटूं लागला.

केवढा हा फरक माझें मनांत झाला ?

मीं उडतें बेट पाहिलें, गणिती पाहिले, वेडे संशोधक पाहिले व जादुगारांचा देश पाहिला. त्या प्रत्येक देशाच्या भेटीनें माणूस म्हणजे क्षुल्लक प्राणी असें माझें मत दृढ होत गेलें !

पशू श्रेष्ठच असतील काय ? मनुष्यांपेक्षां त्यांना बुद्धि असेल तर ते श्रेष्ठच म्हणावेत. असा देश कधीं तरी पाहूं या. या प्रकारें विचारांचें वादळ मनांत उठलेलें असतांना मीं अमरलोकाचा निरोप घेतला.

'लग्नाग' देशाहून मी जपानमध्यें आलों. तेथें जिवंत माणसांत व उद्योगी मनुष्यांत थोडे दिवस काढून मी जहाजाचा शोध करूं लागलों. शेवटीं एक डच जहाज भेटलें.

त्यांत बसलों व हॉलंडच्या दिशेनें हें जहाज माझ्या मायभूमींत–इंग्लंडला पोहोंचलें. ही तिसरी सफर संपवून मी इंग्लंडला आलों. तो दिवस होता–१६ एप्रिल १७१०.

———

# हूं हूं देश

## सफर चौथी

### (अश्वांच्या राज्यांत)

ज़ित्याची खोड मेल्याशिवाय जात नाहीं हें खरें! मी तिसऱ्या सफरीनंतर आरामांत दिवस काढले आणि पुढेंहि काढले असते. 'लापुटा' वगैरे देशांच्या आठवणी वारंवार सांगून स्वतःची व इतरांची भरपूर करमणूक केली असती तर बरें झालें नसतें का?

पण साहस व चळवळ्या स्वभाव जर जन्मतः माझ्या रक्तांत आला तर पुढचें भवितव्य व घटना चुकतीलच कशा? चुळबुळ सुरू झाली माझी.

सफरींचीं स्वप्नें पडूं लागलीं. प्रथम जें स्वप्न पडलें त्यांत लिलिपुटचीं माणसें आमच्या घरीं आलेलीं दिसलीं. त्यांच्यासाठीं लहान लहान भांडीं, कपडे यांची व्यवस्था करतांना मला मौज वाटत होती.

माझीं मुलें त्यांच्याशीं खेळत होतीं. बायको मात्र रागावून म्हणत होती, 'अहो, एवढेसे हे चिमुकले जीव. आपल्याकडचा कुत्रा किंवा बोका खाईल त्यांना. विनाकारण हत्त्या होईल.'

‘ आपण जपूं त्यांना. लहानशा पेटींत ठेवूं. ’

‘ तुम्हांला त्या ‘ ब्रॉबडिगनॅग ’ च्या लोकांनीं ठेवलें तसेंच ना ? ’ माझ्या एका मुलानें प्रश्न केला,– आणि काय चमत्कार ?

मला असें दिसलें कीं, मी एका छोटया पेटींत आहें. बायको व मुलें मोठींच आहेत. मी लिलिपुटच्या लोकांपुढें जसा धिप्पाड होतों तेवढींच माझीं मुलें व बायको धिप्पाड. भव्य अशा स्वरूपांत मला दिसलीं.

मुलें माझा चिमुकला आकार पाहून हंसत होतीं. मी रागावत होतों. माझ्या एका मुलानें मला उचलून अधांतरीं ६० फूट उंचीवर नेलें. मी घाबरलों. किंकाळी फोडली !



...जागा झालों तेव्हां पलंगावरच होतों. पण किंकाळी मात्र खरी होती.

'काय झालं तुम्हांला ?' बायको मला विचारूं लागली. ती पुढें म्हणाली, 'जर सफरीवर न जाण्यानें त्रास होत असेल तर एकदां जाऊन या छोटयाशा सफरीवर. फार दूरवर मात्र नको.'

मी कांहींच बोललों नाहीं. दिवसभर अस्वस्थच होतों. मला बोलावणें येईल, पुन्हां सफरीचा मोह होणार व मी जाणारच असें माझें अंतःकरण मला सांगूं लागलें.

त्या गोष्टीचा पडताळा मला आला.

त्या दिवशीं रात्रीं मला पुन्हां विचित्र स्वप्न पडलें. त्यांत, मी एका प्रदेशांत गेलों असून तेथील घोडे माझ्याशीं बोलत होते.

'आम्ही मानवांपेक्षां श्रेष्ठ आहोंत याचा तुला प्रत्यय येईल.'

'पशूसुद्धां बुद्धिमान असतात.'

'पशूंचा विजय असो !'

'मानवांचा धिक्कार असो !'

अशा आरोळ्या ठोकणारे घोडयांचे तांडे माझ्या दिशेनें धांवत आले व मी स्वप्नांतून जागा झालों; घामाघूम झालों, किती विचित्र स्वप्न !

सकाळीं न्याहारीसाठीं टेबलापाशीं बसलों असतां मला कुणीतरी बाहेरून हांक मारली.

मी दरवाज्यापाशीं गेलों. पाहतों तों एक प्रौढ, सज्जन दिसणारा गृहस्थ माझी चौकशी करीत होता.

‘ गलिव्हर यांचें हेंच घर का ?’

‘होय. हेंच त्यांचें घर. ’

‘ मला गलिव्हर यांना भेटावयाचें आहे..’

‘ या आंत. मीच गलिव्हर. ’

मीं त्या गृहस्थाला घरांत बोलावून बसावयास सांगितलें. हा कशासाठीं आला असावा हें मीं तर्कानें जाणलें होतेंच.

‘ माझीं दोन जहाजें आहेत. त्यांपैकीं एक लवकरच दक्षिण अमेरिकेकडे सफरीसाठीं जाणार आहे. त्या गलबतावर तुम्हीं यावें अशी विनंति करण्याकरतां मी आलों आहें. ’

‘ मी सर्जन आहें. पण मला आतां तो व्यवसाय करावयाचा नाहीं. निदान गलबतावर जाऊन तर नाहींच. ’

‘ मी तुम्हांला सर्जन म्हणून बोलावणें करण्याकरतां आलों नाहीं. ’

‘ मग ?’ मीं आश्चर्यानें विचारलें. माझी पत्नीहि चकित झाली. कशासाठीं बोलावणें ?

‘या दक्षिण अमेरिकेस जाणाऱ्या जहाजाचा कॅप्टन (कप्तान) आजारी आहे. तो लवकर बरा होणार नाहीं. माझें हें जहाज तर लवकरांत लवकर निघायलाच हवें.’

‘बरोबर.’ मी कांहींतरी बोलायचें म्हणून बोललों व दुजोरा दिला.

‘मला अनुभवी कप्तानाची जरुरी आहे. मी जहाजाचा मालक आहें. पण कॅप्टनप्रमाणें जहाजावर ताबा ठेवणें याचा मला अनुभव नाहीं. मी सफरीवर जात नाहीं. फक्त माल पाठवतों.’

‘मग मी कसा काय उपयोगी पडेन तुमच्या ह्या अडचणीचे वेळीं ?’ मीं शेवटीं स्पष्टच विचारलें. त्या मालकाला काय हवें तें त्यानें सांगितले.

‘तुम्हींच त्या जहाजावर कप्तान म्हणून जावें अशी माझी इच्छा आहे. सध्यांच्या कप्तानाला जो पगार मिळतो त्यापेक्षां तिप्पट पगार मी अॅड्व्हान्स (अगोदर) म्हणून द्यायला तयार आहें.’

सफरीचें आकर्षण, कॅप्टन म्हणून नेमणूक व तिप्पट पगार अगोदर हातांत येणार ! हा तिहेरी मोह मला जाणवला. पत्नीकडे पाहिलें. पण तिच्या डोळ्यांनीं खुणावलें,

‘कांहीं हरकत नाहीं. ही मानाची व लठ्ठ पगा-

राची नोकरी आहे. स्वीकारा.'

'मीं तुमचीच निवड मनाशीं केली. कारण तुम्हांला फार मोठा अनुभव आहे. तुमच्या तीन सफ-रींची हकीकत मीं लोकांचे तोंडून ऐकली आहें. तसेंच पूर्वींच्या जहाजाच्या मालकांनीं तुमचीच शिफारस केली आहे. तुमची संमति आहे असेंच समजतों. ही पगाराची रक्कम एक वर्षाची आगाऊ.' त्यानें पैशांच्या थैल्या आपल्या बाहेर उभ्या असलेल्या नोकरांकरवीं मजपुढें ठेवल्या. लेखी करार करून आणला होता. त्यावर माझी सही घेतली. मग म्हणाला, 'तुमची सफर सुखाची होवो.'

तो निघून गेला. मी तयारीला लागलों.

तीन वर्षांची घरची खर्चाची तरतूद झाली होती. पैसे मीं बायकोजवळ दिले. बायको खूष होती. मुलें खूष होतीं. पैशानें सर्व संसारी लोक खूषच होतात!

मीं ठरलेल्या दिवशीं कप्तानपद स्वीकारून त्या नेमून दिलेल्या जहाजाची पाहणी केली व ठरलेल्या दिवशीं गलबत हांकारलें.

प्रवास प्रथम उत्कृष्ट झाला. मला बरें वाटलें! त्यानंतर आमच्या जहाजावरील खलाशी एकामागून एक आजारी पडूं लागले. कसला तरी रोग पसरत होता, हें निश्चित.

मग त्या रोगाला एकेक खलाशी बळी पडूं लागला. बरेच खलाशी मृत्यु पावले व मला खलाशांचा तुटवडा पडूं लागला. मीं ठरवलें कीं, नव्या खलाशांची भरती करूनच ही अडचण दूर केली पाहिजे.

तेवढ्यांत माझ्या एका विश्वासू खलाशानें सांगितलें, 'साहेब, हें जहाज आतां दहा मैलांवर असलेल्या बेटाकडे न्यावें. त्या बेटाचें नांव आहे बारबेडोझ् ! तेथें आपल्याला खलाशी बरेचसे कामावर नेमून घेतां येतील.'

त्याप्रमाणें आमचें जहाज त्या बेटाकडे गेलें व तेथें सुमारें अकरा दिवस आम्हीं मुक्काम केला. मी नवीन खलाशी कामावर घेणार आहे हें तेथें जाहीर केलें. त्याबरोबर पन्नास माणसें हजर झालीं व कामावर घ्या म्हणूं लागलीं.

मीं प्रत्येकाची परीक्षा घेतली. तरबेज असलेल्या पंचवीस जणांना मीं कामावर घेतलें. आतां पुढचा प्रवास सुखकर होणार असें मी मनाशीं म्हणूं लागलों. पण हा माझा अंदाज साफ चुकला.

उलट, हे नवे खलाशी मला संकटांत टाकण्यास कारणीभूत झाले. त्याचें असें झालें,

तारीख ९ मे १७११ अशी कॅलेंडरची तारीख मीं भिंतीवर लावली व माझ्या केबिनचें दार उघडून

एक खलाशी आंत आला. त्याच्या वागण्यांत, बोलण्यांत, उभें राहण्यांत ताठा होता. तो नम्रपणा धारण करणारा साधा गडी नव्हता.

मी :– काय गडबड आहे ?

खलाशी :– आतां नवें बेट जवळ येत आहे. या बेटावर आम्हीं तुम्हांला जायला सांगणार !




मी :– आम्हीं कोण ? तूं कोणाचा हुकूम मानतोस ? मला हुकूम कोण करणार ?

खलाशी :– साहेब, तुम्हीं जे पंचवीसजण भरती केलेत त्यांपैकीं मी एक आहें. आम्हीं चांचेगिरी करणारे

आहोंत. आमच्या टोळीनें या गलबताचा ताबा घेतला आहे.

मी :–पुढें काय करणार ?

खलाशी :–नवा कप्तान आमच्या टोळींतला आहे. त्याचा हुकूम मानणें हें आमचें काम. त्याच्या हुकुमाप्रमाणें मी आपल्याला सांगतों कीं एका लहान होडींत आपल्या सामानासह तुम्हांला एकटयाला बसवून त्या बेटाकडे जायला सांगायचें आहे.

होडी तयार आहे. आपल्याला काय सामान घ्यायचें तें घ्या. बेटाच्या जवळच गलबत उभें राहील. आपण होडींत बसून त्या बेटावर जा. आम्ही गलबत घेऊन पुढें जाणार आहोंत.

मी :–जर मीं विरोध केला तर ?

खलाशी :–गडबड, दंगाधोपा, विरोध केला तर तुमच्या प्राणांची हमी आम्हीं घेऊं शकणार नाहीं. तुमच्या जिवाची पर्वा तुम्हीं करायची कीं नाहीं तें पहा.

मी :–बेटावर जाण्याची मी तयारी करतों. होडी तयार ठेवा. माझे प्राण मला प्रिय आहेत.

मीं याप्रमाणें थोडक्यांत निर्णय घेतला. कारण दोष माझाच होता. चोर, अट्टल बदमाष व चांचे यांच्या भरतीस मीच कारणीभूत होतों. त्यावेळीं त्यांच्या कामांतील कौशल्यावर मी खूष होतों पण जास्त चौकशी

करण्याचा धूर्तपणा मीं दाखविला नव्हता.

त्या अव्यवहारीपणाचें माप मला पदरांत घ्यावें लागलें. कप्तानपद स्वीकारलें, घरीं भरपूर पैसा दिला आणि सफरीची हौस भागवतांना मी आतां संकटांत सांपडलों होतों.

मनुष्यजातीच्या विश्वासघातकीपणाचा मलाहि आतां चांगलाच तिटकारा आला. मीं हें संकटांचें आव्हान स्वीकारलें व होडींत बसून गलबताला रामराम ठोकला. गलबत निघून गेलें.

मीं बेटाकडे होडी वल्हवली. अंतर फार नव्हतेंच. सामानहि फार नव्हतें. कपडे, तलवार व इतर किरकोळ वस्तु एवढेच !

मीं बेटावर पाय ठेवला. सावधपणें हिंडूं लागलों. प्रत्येक पावलाबरोबर मी सर्व बाजूंस नजर टाकीत होतों.

जंगली लोक या बेटावर भेटतील अशी मीं अटकळ बांधली. ते भेटले तर मजजवळच्या किरकोळ वस्तु त्यांना भेट देऊन खूष करावें व त्यांच्याशीं मैत्री जोडावी असें मीं मनाशीं ठरवलें.

त्याप्रमाणें पुढें पुढें जाऊं लागलों.

प्रथम जंगलच खूप घनदाट भेटलें. गर्द झाडींतून जातांना गारवा जाणवत होता. सुमारें अर्धा मैल मी याप्रमाणें चाललों व जंगल संपलें.

पण लांब अंतरावर माणसांचा घोळका मात्र असावा असें मला वाटलें. बहुधा जंगली माणसांचा तांडा असावा असें मला वाटून मी त्वरेनें त्या दिशेकडे निघालों. झपाझप पावलें टाकतांना माझा उत्साह दुणावत होता. परंतु—वेगळेंच घडलें !

तो माणसांचा तांडा चमत्कारिक होता. त्यांच्यांत अर्धवट माणसाचे गुण होते. शरीर केंसाळ होतें. मला तीं माकडेंच वाटलीं. पण तीं माकडें नव्हतीं.

— केंसाळ रानटी प्राणी होते ते !

— मनुष्यासारखी व माकडासारखी दिसणारी त्यांची आकृति भयानक व तिरस्कार निर्माण करील होती. मला पाहतांच त्यांनीं मला गराडा घातला.

मग माझे केंस कुणीतरी ओढले.

कुणी माझ्याशीं झोंबाझोंबी करून खिशांत हात घालून पाहूं लागले. दोघां तिघांनीं माझे पाय व हात ओरबाडले. मला त्रास झाला व रागहि आला. मित्रत्व करण्यास हीं जंगली माणसें पूर्ण नालायक होतीं.

मीं लगेच माझी तलवार उपसली.

दोघां—चौघांना वार केले. त्याबरोबर त्यांची गाळण उडाली. माझ्यावर संघटित हल्ला करण्याचा त्यांनीं बेत केला. मीहि तयारीत राहिलों.

पण तशी वेळ आली नाहीं.

कारण मी तलवार उपसण्यापूर्वी चीत्कार करीत तो जंगली माणसांचा तांडा पळून गेला. मला फार आश्चर्य वाटलें. काय कारणामुळें हीं माणसें भिऊन पळालीं ? मीं भोंवतीं नजर टाकली.

एक घोडा हळूहळू माझ्या दिशेनें येत होता. तरीहि मला नीट बोध होईना. मी थांबलों. तो घोडा जवळ येतांच मी त्याच्या पाठीवर थाप मारण्यासाठीं हात उचलला—

—तोंच त्यानें आपल्या पुढच्या टापेनें अगदीं सहज झाडून टाकला. झिडकारला म्हणणें जास्त बरोबर होईल. मी आश्चर्य करूं लागलों. तेवढ्यांत तेथें दुसरा एक घोडा आला.

त्या दोघांनीं आपापल्या उजव्या पायाच्या पुढच्या टापांनीं एकमेकाला स्पर्श केला. मी हें दृश्य पहात होतों. दमल्यामुळें मी खालीं बसलों. मग ते दोन्ही घोडे माझ्याजवळ आले.

मला वाटलें अरेबियन नाइटस्‌सारखें कांहीं घडत आहे. हे घोडे पूर्वींचे पुरुषच असावेत.

— ( माझा हा अंदाज चुकला. ते घोडेच होते. पण मानवापेक्षां सुसंस्कृत असून त्या बेटाचें स्वामित्व त्यांच्याकडे होतें, हे नंतर कळलें. )

त्या दोघांनीं मी जमिनीवर पडलेलों असतां

स्वतःच्या टापांनीं माझ्या हातापायांस चांचपून पाहिलें. माझ्याबद्दल ते दोघे आपापसांत बोलत होते. प्रश्नोत्तरें करावीं त्याप्रमाणें वेगवेगळे आवाज काढून ते एकमेकांस सांगत होते.



ती त्यांची भाषा असावी.

त्या संभाषणांत 'याहू' 'याहू' असा शब्द वारंवार येत होता. मीं लगेच तो शब्द उच्चारला व त्यांच्याकडे पाहिलें. त्यांच्या चेहेऱ्यावर कमालीचें आश्चर्य उमटलें !

मग आणखी गंमत झाली.

त्यांनीं 'हूं हूं' असा शब्द उच्चारला व मजकडून म्हणवून घेतला. मी तो शब्द म्हणावा म्हणून ते

आपल्या पुढच्या पायाच्या टापांनीं स्पर्श करीत. मला त्यांची खूण कळली व मीं त्याप्रमाणें उच्चार केला.

मला नंतर कळलें कीं मी ज्या बेटावर उतरलों होतों तो प्रदेश हूं हूं या नांवानें ओळखला जात होता. त्या देशाचें नांव होतें हूं हूं ! तेथें राहणारे प्राणी म्हणजे हे घोडे !

(मला ही माहिती नंतर कळली. कारण या बेटावर मी ३ वर्षें राहिलों व येथील भाषा नीट शिकून घेतली या हूं-हूं देशांतील लोकांबद्दल माहिती घेतली. त्यांच्याबद्दल मला आदर निर्माण झाला.)

मग त्या घोड्यांपैकीं एकानें मला चलण्याची खूण टापेनें व मान हलवून केली. मी लगेच उभा राहून त्यांच्या इषाऱ्याप्रमाणें त्यांच्या घरीं गेलों.

तेथें जातांना मला असें दृश्य दिसलें कीं, माणसासारखे दिसणारे जे जंगली प्राणी मला भेटले होते, ते गुलाम व नोकर म्हणून 'हूं हूं' लोकांची सेवा करीत होते.

जंगली व मर्कटाप्रमाणें दिसणाऱ्या त्या लोकांना 'याहू' हें नांव हूं हूं लोकांनीं दिलें होतें.

मी प्रथम याहू आहें असें समजून त्या घोड्यांनीं मला नोकराप्रमाणें कमीपणाची वागणूक दिली. पण मी माझ्या वागणुकीनें त्यांना माझ्यांतील व याहू

जातींतला फरक दाखवला.

याहू जातीचे लोक अत्यंत घाणेरडे होते. ते जितके भित्रे तितकेच क्रूर होते. विश्वासूपणा ही चीज त्यांना माहीत नव्हती.

इमान, प्रामाणिकपणा, सचोटी या गुणांची तोंड-ओळखहि याहू लोकांना नव्हती. बेइमानी व विश्वास-घात त्यांच्या रक्तांत भिनला होता. या याहूंच्या गुणांचा कटु अनुभव 'हूं हूं' सारख्या सुशिक्षित उच्च प्राण्यांना आला होता.

म्हणून मलाहि ते याहूंप्रमाणें वागवीत.

माझ्यांतील फरक कळल्यावर मात्र त्यांनीं माझ्या-वर कृपा केली. मला चांगली वागणूक दिली. मी त्यांची भाषा इतक्या झपाट्यानें शिकलों कीं माझे मालक (ते दोन घोडे) फारच चकित झाले.

आकारानें घोड्यांप्रमाणें असणारे हे प्राणी अत्यंत सुधारलेले होते. सुधारलेल्या म्हणविणाऱ्या मानव-जातींतील सर्व चांगले गुण त्यांच्यांत—(हूंहूं प्राण्यांत) होते.

मानवजातींत भरलेले जे दुर्गुण, दांभिकपणा, द्वेष, खोटें बोलणें, बेइमानीपणा, कपटीपणा, दुहेरी

वागणूक, हिंसा, अनीति, त्या दुर्गुणांचा लवलेशहि या हूंहूंत नव्हता. म्हणजेच हे पशु मानवापेक्षां श्रेष्ठ असें माझें मत बनलें.

मी मानवप्राण्यांचा तिटकारा करूं लागलों. आपल्या देशांत जाऊं नये, कारण तेथें सर्व याहू आहेत, त्यांचा सहवास नको, आपली बायकामुलें, खलाशी, मित्र, सर्व याहू आहेत; ही कल्पना मनांत घर करून राहिली. याहूंचा सहवास टाळावयाचा उपाय म्हणजे इंग्लंडला न जातां या हूं हूं देशांतच राहणें हा होय.

मी त्या माझ्या इच्छेनुसार सुमारे तीन वर्षें माझ्या मालकाकडे व त्याच्या बंधूचे सहवासांत राहिलों. त्या काळांत मला खूप माहिती मिळाली.

हूंहूंची चालरीत, कायदेकानू, व्यवस्था, त्यांची गाणी, आचारविचार यांची माहिती मला जसजशी मिळाली तितका माझा आदर दुणावत गेला. माझ्या मालकाबद्दल व त्याच्या भावाबद्दल तर मला कमालीची आपुलकी वाटे. शब्दांनीं ती व्यक्त करतां येणार नाहीं.

हे लोक ७० ते ७५ वर्षें जगत, असें मला कळलें. मुख्यत: एक गोष्ट लक्षांत आली कीं, या देशांत रोगराई,

वैद्य, डॉक्टर यांचें चिन्ह किंवा मागमूसच दिसला नाहीं. कारण हे लोक मरेपर्यंत कधींच आजारी पडत नसत.

रोगाची भीति त्यांना नव्हती. तसेंच मृत्यु अटळ आहे हें त्यांच्या बुद्धीनें मान्य केलें होतें. त्यामुळें त्या मृत्यूला ते भयंकर समजत नसत. त्याची त्यांना भीति वाटत नसे.

'अमुक माणूस गांवाला गेला' असें आपण जितक्या सहजपणें सांगतो तितक्या सहजपणें ते हूंहूं लोक मृत्यूबद्दल बोलत. 'तो अमका मेला.' असें सहजपणें एकमेकांस कळवीत.

हूं हूं ह्या घोडयांचे जगांत मी अगदीं रमून गेलों. माझी व्यवस्था मीं तेथें लावून घेतली होती.

— एक लहानशी झोपडी मीं बांधली.

— तेथेंच मला आवश्यक असलेले लांकडी सामान मीं तयार करून घेतलें.

पकडलेल्या सशांचे कातडें मीं उबदार कपडे तयार करण्याकरतां वापरले. फळें, मध, धान्य हीं मला विपुल प्रमाणांत मिळत गेली. कारण माझ्या मालकांची कृपा ! त्यांची मेहेरनजर !

मीं आनंदानें तीन वर्षें काढलीं. आतां असेच आपलें आयुष्य येथें सुखानें घालवतां येईल हा विचार मी करतांना दैवानें कलाटणी दिली.

एका दुपारीं माझा मालक माझ्याकडे फार दुःखी मुद्रा करून आला. मग आमचें संभाषण झालें.

‘ महाराज, आपण फार दुःखी दिसतां. ’

‘ होय. आज मी फार दुःखी आहें. ’

‘ काय कारण घडलें ? मला सांगा. ’

माझा मालक म्लान वदन करून बराच वेळ बसला. बोलण्यापूर्वींच त्याला वेदना होत असाव्यात.

‘ आज मला ताकीद देण्यांत आली कीं, माझ्या घरांत मीं ज्या याहूला आश्रय दिला आहे, त्याला ताबडतोब घालवून द्यावें. ’

एका दमांत माझा मालक एवढा शब्दसमुच्चय बोलून गप्प बसला. मीं जास्त बडबड केली नाहीं. मीहि बराच वेळ गेल्यावर मीं बोलण्यास प्रारंभ केला.

‘ आपल्याला ही समज व हुकूम कुणीं दिला तें मला सांगण्यास हरकत नाहीं ना ? ’

‘ कांहीं हरकत नाहीं. सर्व कारभार स्वच्छ व उघड आहे. येथील हूंहूंच्या कायदेमंडळानें या हुकुमाची

अंमलबजावणी करण्यास मला सक्त ताकीद दिली आहे.'

'आपण त्यांना हें समजावून सांगितलें असेलच कीं, मी याहूंप्रमाणें वाईट नाहीं. याहूंप्रमाणें फक्त थोडा थोडा मी दिसतों हेंच बाह्य साम्य आहे.'

'तुझा तर्क अगदीं बरोबर आहे. मीं हेंच त्यांना समजावून सांगण्याचा मनापासून प्रयत्न केला, पण व्यर्थ. तें त्यांना पटत नाहीं. याहूंच्या जातीचाच प्राणी तूं आहेस, वेगळा वागत असलास म्हणून काय झालें असें त्यांचें म्हणणें आहे.'

'मला जावें लागणार तर!' असें मीं विचारलें व मी मानसिक धक्क्यानें बेशुद्ध झालों.

जेव्हां मी जागा झालों तेव्हां माझा मालक आपल्या टापांनीं मला थोपटून उठवत होता. गोंजारत होता. मीं डोळे उघडले हें पाहतांच तो म्हणाला—

'तुला मीं माझ्या घरीं आश्रय दिला व सन्मानानें वागवतों हें कुणासहि पसंत नाहीं. याहूंच्याबद्दल या देशांत तिरस्कार आहे. त्यामुळें माझ्यावर सर्वांनीं गहजब केला आहे. तुला जावें लागेल. माझा नाइलाज

आहे. माझ्या वाईट वाटण्याचा कांहीं उपयोग नाहीं.'

'बरें आहे मालक. मी तयारी करतों जाण्याची.' असे म्हणून लांकडी ओंडके शोधावयास बाहेर पडलों. ओंडका माझ्या मनाप्रमाणें सांपडला.

मीं त्याची ओबडधोबड अशी कामापुरती होडी तयार केली. वल्हीं तयार केलीं. कपडे, धान्य व मध भरून घेतला. सर्व तयारी केली.



मीं निरोप घेतला मालकाचा. त्याचे डोळ्यांत व माझ्या डोळ्यांत अश्रु उभे राहिले. मी दुःखी अंतःकरणानें होडींत बसलों.

मग होडी वल्हवीत वल्हवीत मी जवळच्या

दुसऱ्या बेटावर गेलों. तेथें कांहीं दिवस काढले. ती बेटाची जागा मीं बरोबर निवडली होती. बरींच जहाजें त्या बेटावर गोडें पाणी भरून घेण्याकरतां थांबत असत.

एक दिवस एक पोर्तुगीज जहाज तेथें आलें. त्या बेटावरचें गोडें पाणी नेण्याकरतां खलाशी मंडळीहि आली. मला पाहून त्यांना आश्चर्य वाटलें. मीं त्यांना माझी हकीकत सांगितली.

'मला याच ठिकाणीं रहावयाचें आहे. याहूंच्या देशांत मला येणें नको वाटतें. जवळच हूं हूंचा देश आहे. तो आधार आहे.' मीं असें म्हणताच त्या खलाशी लोकांना वाटलें कीं मला वेड लागलें आहे.

– पण मी स्पष्टपणें सर्व सांगत होतों.

– शेवटीं मीं जहाजावर चढलों. पोर्तुगालमध्ये लिस्बन बंदरांत आमचें जहाज पोहोंचलें. तेथें ज[illegible] बदलून मी इंग्लंडला आलों. घरीं आलों त[illegible] स्वस्थता वाटत नव्हती.

मी याहूंच्या सहवासांत रहात आहें ही [illegible] मला घरांतहि त्रास देत होती. मुलाबाळांकडे व [illegible] मी कित्येक दिवस अगदीं परकेपणानें व तिरस्कारान

पहात असें. तीन वर्षें मीं हूंहूंच्या देशांत काढलीं होतीं.

शेवटीं मीं माझ्या मनावर ताबा मिळवला. दूर अशा खेडेगांवांत, पूर्ण एकांत जागीं मी शेतवाडी करून राहूं लागलों. प्रवासास पुन्हां गेलों नाहीं. हूंहूंची आठवण म्हणून दोन घोडे मीं खरेदीं केले.

त्यांना जीन व लगाम न घालतां स्वतंत्र ठेवलें. त्यांची भाषा मला कळते. ते मला मित्र व आप्त समजतात. मी सुखी झालों.

भाग तिसरा

**समाप्त**